**श्री. रामदास खेडकर निवासी उपजिल्हाधिकारी नाशिक यांची पर्यटन संचालनालयाचे प्रादेशिक कार्यालय नाशिक येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन आदेश क्रमांक टिडीसी २०१९/०७/प्र.क्र.४७१/पर्यटन**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय,मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १६ नोव्हेंबर, २०१९**

**संदर्भ**-: १. शासन निर्णय क्र.टीडीसी-२०१४/२/प्र.क्र.९६/पर्यटन, दि.१२.०४.२०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/१२, दिनांक १७/१२/२०१६.
२. शासन निर्णय क्र.टीडीसी-२०१४/२/प्र.क्र.९६/पर्यटन, दि.०१.११.२०१७

**आदेश** -:

श्री. रामदास खेडकर निवासी उपजिल्हाधिकारी नाशिक यांची उप संचालक (पर्यटन) ,प्रादेशिक कार्यालय, पर्यटन संचालनालय नाशिक या पदावर प्रतिनियुक्तीने खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

अ) उप संचालक (पर्यटन) प्रादेशिक कार्यालय, नाशिक हे वेतनश्रेणी (एस-२३. रु.६७७०० ते रु.२०८७००) मधील पद असून श्री. रामदास खेडकर हे सदर पदावर कार्यरत असेपर्यंत अथवा पुढील आदेशापर्यंत सदर पद श्रेणी अवनत करण्याच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

ब) श्री. रामदास खेडकर निवासी उपजिल्हाधिकारी नाशिक हे प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय मूळ पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेस समाप्त होईल.

क) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास म्हणजे महसूल व वन विभागास राहील.

ड) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा शासनास म्हणजेच पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी या विभागाने महसूल व वन विभागास तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) श्री. रामदास खेडकर यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल.

ई) श्री. रामदास खेडकर यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... ई) नियम १९८१ मधील नियम ३९ व ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी व त्या नियमाखालील परिशिष्ट तीन मधील तरतुदी लागू राहतील. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/१२, दिनांक १७/१२/२०१६ यामधील तरतुदी देखील लागू राहतील.

फ) श्री. रामदास खेडकर यांच्या सेवाविषयक बाबी या त्यांच्या मूळ विभागामार्फत हाताळल्या जातील.

२. श्री. रामदास खेडकर निवासी उपजिल्हाधिकारी नाशिक) यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी महसूल व वन विभागामार्फत हाताळण्यात येतील. डॉ.धनंजय सावळकर यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी महसूल विभागाने त्यांचे आदेश क्र. टिआरएफ-०७१९/ प्र.क्र.९३/ ई-२ दि.०६.०९.२०१९ अन्वये यापूर्वीच कार्यमुक्त केले आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१११९१२०७३०९१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
Date: 2019.11.19 12:11:22 +05'30'

(र.ज.कदम)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
२. मा.सचिव (पर्यटन), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, नाशिक.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२१ मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (पर्यटन).